**श्री. सुजित बापूराव पानसरे, सहाय्यक नगर रचनाकार यांची लोणावळा नगरपरिषद, लोणावळा, जि. पुणे येथे प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र.बदली-५८१५/११५१/प्र.क्र.१८६/नवि-२७,**
मंत्रालय, मुंबई- ४०००३२.
दिनांक :- २१ सप्टेंबर, २०१५.

**पहा** :- १. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.एसआरव्ही-२०१४/मुस-३४/प्र.क्र.३७९/१२, दि.११ फेब्रुवारी, २०१५.
२. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आस्था/लोणावळा प्र.नि./प्रशा-१/५५, दि.२१ जुलै, २०१५.

**प्रस्तावना :-**

लोणावळा नगरपरिषद, लोणावळा, जि. पुणे येथील सहाय्यक नगर रचनाकाराचे रिक्त पद प्रतिनियुक्तीने भरण्याबाबत संचालक, नगर रचना, पुणे यांनी त्यांच्या आस्थापनेवरील सहाय्यक संचालक, नगर रचना संवर्गातील अधिकाऱ्यांकडून इच्छुकता मागविण्यात आली होती. त्यानुसार सहाय्यक संचालक, नगर रचना संवर्गातील एकूण ०८ अधिकाऱ्यांच्या इच्छुकता प्राप्त झाल्या होत्या. यावर नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या अधिपत्याखालील नागरी सेवा मंडळ-२ यांनी त्यांच्या बैठकीतील निर्णयानुसार सह जिल्हानिबंधक, पुणे शहर यांच्या कार्यालयात कार्यरत असलेले श्री. सु. बा. पानसरे, सहाय्यक नगर रचनाकार यांची मुदतपूर्व बदली करुन त्यांची लोणावळा नगरपरिषद, लोणावळा, जि. पुणे येथील सहाय्यक नगर रचनाकाराच्या रिक्त पदावर प्रथम एक वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्याची शिफारस केलेली आहे. त्यास अनुसरुन संचालक, नगर रचना, पुणे यांनी त्यांच्या **संदर्भ-२** येथील पत्रान्वये श्री. सु. बा. पानसरे, सहाय्यक नगर रचनाकार यांची लोणावळा नगरपरिषद, लोणावळा, जि. पुणे येथे प्रथम एक वर्षासाठी प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्याबाबत सामान्य प्रशासन विभागाच्या **संदर्भ-१** येथील दि.११.०२.२०१५ रोजीच्या परिपत्रकातील तरतुदीनुसार "वरिष्ठ प्राधिकारी" या नात्याने प्रस्ताव विभागाच्या मान्यतेस्तव सादर केलेला आहे.

**०२.** सबब, श्री. सु. बा. पानसरे, सहाय्यक नगर रचनाकार यांची लोणावळा नगरपरिषद, लोणावळा, जि.पुणे येथील सहाय्यक नगर रचनाकार रिक्त पदावर प्रथम एक वर्षासाठी प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्याची बाब विचाराधीन होती, याबाबत पुढीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) (दोन) व कलम ४ (५) व महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील परिशिष्ट-तीन, नियम ४० (१) मधील व सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक, दि.११.०२.२०१५ मधील तरतुदीनुसार श्री. सुजित बापूराव पानसरे, सहाय्यक नगर रचनाकार, सह जिल्हानिबंधक, पुणे शहर यांची लोणावळा नगरपरिषद, लोणावळा, जि. पुणे येथील "सहाय्यक नगर रचनाकार" रिक्त पदावर प्रथम एक वर्षासाठी प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात येत आहे.

०२. श्री. सु. बा. पानसरे, सहाय्यक नगर रचनाकार हे ज्या दिनांकापासून लोणावळा नगरपरिषद, लोणावळा, जि. पुणे येथील सहाय्यक नगर रचनाकार पदाचा कार्यभार स्वीकारतील त्या दिनांकापासून त्यांची प्रतिनियुक्ती एक वर्षाच्या कालावधीकरिता राहिल.

०३. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी श्री. सु. बा. पानसरे, सहाय्यक नगर रचनाकार यांना प्रतिनियुक्तीच्या ठिकाणी रुजू होण्याकरिता आवश्यक ते कार्यकारी आदेश निर्गमित करण्याची कार्यवाही करावी.

०४. श्री. सु. बा. पानसरे, सहाय्यक नगर रचनाकार यांच्या कार्यमुक्तीबाबतचे संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यकारी आदेश प्राप्त होताच सह जिल्हानिबंधक, पुणे शहर यांनी त्यांना प्रतिनियुक्तीच्या ठिकाणी रुजू होण्याकरिता तात्काळ कार्यमुक्त करण्याची कार्यवाही करावी.

०५. श्री. सु. बा. पानसरे, सहाय्यक नगर रचनाकार यांना प्रतिनियुक्तीच्या ठिकाणी हजर होण्यास कोणत्या दिनांकास कार्यमुक्त करण्यात आले व ते प्रतिनियुक्तीच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास अवगत करण्यात यावे.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेताक २०१५०९२११६१८३२६२२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dilip Sitaram Anerao

Digitally signed by Dilip Sitaram Anerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=26293749901b04ac59c3d853c2fdc32df6083d811902b3e94b40b924fa028887, cn=Dilip Sitaram Anerao
Date: 2015.09.21 16:22:05 +05'30'

**(दि. सि. अणेराव)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

श्री. सुजित बापूराव पानसरे, सहाय्यक नगर रचनाकार, सह जिल्हानिबंधक, पुणे शहर यांना
**(संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेमार्फत)**

**प्रत :-**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई / महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर.
२. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई / निवासी लेखापरिक्षा अधिकारी, नागपूर.
३. आयुक्त, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई.
४. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. **(२-प्रती)**
५. सह संचालक, नगर रचना, पुणे विभाग, पुणे.
६. उप सचिव (नवि-१९), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सह जिल्हानिबंधक, पुणे शहर, पुणे.
८. मुख्याधिकारी, लोणावळा नगरपरिषद, लोणावळा, जि. पुणे.
९. प्रधान सचिव (नवि-१) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवडनस्ती / नवि-२७.

*****